**राजीव गांधी प्रशासकीय गतिमानता (प्रगती) अभियान व स्पर्धा-२००९ या वर्षाकरिता राज्यस्तरावरील विजेत्या कार्यालयांना पारितोषिकांची रक्कम मंजूर करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
सामान्य प्रशासन विभाग,
शासन निर्णय क्रमांक : रागांअ-२०११/प्र.क्र.७६/११/१८-अ,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
दिनांक :- १७ मार्च, २०११.

**वाचा :** १) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र. प्रसुधा-१००२/प्र.क्र.७६/२००२/१८-अ, दि. ०२.०८.२००२,
२) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र. रागांअ-२०१०/प्र.क्र.१५८/१०/१८-अ, दि. १६ मार्च, २०११.

**प्रस्तावना :**

संदर्भाधीन दि. ०२.०८.२००२ च्या शासन निर्णयानुसार राजीव गांधी प्रशासकीय गतिमानता (प्रगती) अभियान व स्पर्धा राज्यात दरवर्षी राबविण्यात येतात. शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र. रागांअ-२०१०/प्र.क्र.१५८/१०/१८-अ, दि. १६ मार्च, २०११ च्या शासन निर्णयान्वये राज्यस्तरावरील प्रथम, द्वितीय व तृतीय क्रमांकाच्या विजेत्या कार्यालयांना अनुक्रमे १० लक्ष, ६ लक्ष व ४ लक्ष रुपयांचे पारितोषिक देण्यात येईल.

**शासन निर्णय :-**

राजीव गांधी प्रशासकीय गतिमानता (प्रगती) अभियान व स्पर्धा-२००९ अंतर्गत राज्यस्तरीय स्पर्धेत समितीने निवडलेल्या विजेत्या कार्यालयांना पुढीलप्रमाणे पारितोषिकाची रक्कम मंजूर करण्यात येत आहे :-

**राजीव गांधी प्रगती अभियान व स्पर्धा - २००९**

| अ.क्र. | कार्यालयाचे नाव | गुणानुक्रमे क्रमांक | पारितोषिकाची रक्कम (रुपये) |
|---|---|---|---|
| १. | जिल्हा परिषद, औरंगाबाद | प्रथम | १०,००,०००/- (रुपये दहा लक्ष फक्त) |
| २. | पालखेड पाटबंधारे विभाग, नाशिक | द्वितीय | ६,००,०००/- (रुपये सहा लक्ष फक्त) |
| ३. | औद्योगिक प्रशिक्षण संस्था, घाटंजी, यवतमाळ | तृतीय | ४,००,०००/- (रुपये चार लक्ष फक्त) |
| | | **एकूण :** | **२०,००,०००/- (रुपये वीस लक्ष फक्त)** |

उपरोक्त नमूद केल्याप्रमाणे एकूण रु. २०,००,०००/- (रुपये वीस लक्ष फक्त) इतकी रक्कम संबंधित कार्यालयांना धनादेशाद्वारे उपलब्ध करून देण्यास मंजुरी देण्यात येत आहे. याकरिता अवर सचिव, रोख शाखा, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

यानिमित्तार्थचा चालू आर्थिक वर्षातील खर्च खालील लेखाशीर्षाखाली सन २०१०-११ च्या वार्षिक अंदाजपत्रकामध्ये मंजूर केलेल्या अर्थसंकल्पीय तरतुदीमधून खर्ची टाकण्यात यावा :-

**" मागणी क्र. ए-४, प्रधानशीर्ष - २०५२ सेक्रेटरिएट सर्वसाधारण सेवा-००९०-सेक्रेटरिएट (००) (०१) सामान्य प्रशासन विभाग (संकेतांक क्र. २०५२००२५)-०५ बक्षिसे "**

पारितोषिकाच्या रकमेचा वापर विजेत्यांनी कार्यालयीन सुधारणेसाठीच करावयाचा आहे. महाराष्ट्र अर्थसंकल्प नियम पुस्तिकेमधील नमुना क्रमांक १० मध्ये खर्चाचा तपशील ठेवण्यात यावा व खर्चाबाबतचे उपयोगिता प्रमाणपत्र विहित नमुन्यात, खर्चाची कारणे व साक्षांकित देयकांच्या प्रतींसह धनादेश मिळाल्यापासून एक महिन्याच्या आत अवर सचिव, सामान्य प्रशासन विभाग/ कार्यासन २६ व कार्यासन १८-अ, मंत्रालय, मुंबई-३२ यांना सादर करण्याबाबत दक्षता घ्यावी. यासंबंधातील अखर्चिक अनुदान सामान्य प्रशासन विभागास दि. ३१.०३.२०११ पूर्वी परत करण्यात यावे, अन्यथा सदर अनुदान खर्च झाले आहे, असे समजण्यात येईल व त्याबाबतची संपूर्ण जबाबदारी संबंधित कार्यालय प्रमुखाची राहील.

सदर शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संकेतांक २०११०३१९१६५९५४००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

**( स. अ. जावळे )**
**कक्ष अधिकारी, सामान्य प्रशासन विभाग**

**प्रति,**

मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, औरंगाबाद,
कार्यकारी अभियंता, पालखेड पाटबंधारे विभाग, नाशिक,
प्राचार्य, औद्योगिक प्रशिक्षण संस्था, घाटंजी, यवतमाळ,
सर्व विभागीय आयुक्त/महानगरपालिका आयुक्त/जिल्हाधिकारी,
मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद,
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)/(लेखा परीक्षा)-महाराष्ट्र-१, मुंबई (प्रत्येकी २ प्रती),
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)/(लेखा परीक्षा)-महाराष्ट्र-२, नागपूर (प्रत्येकी २ प्रती),
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
जिल्हा कोषागार अधिकारी,
वित्त विभाग/व्यय-४,
कक्ष अधिकारी, सामान्य प्रशासन विभाग/का.क्र.२५ व २६,
निवड नस्ती.